**लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळांतर्गत संत भगवान बाबा शासकीय वसतिगृह योजनेतील वसतिगृहांसाठी आवश्यक वस्तु/ साहित्याची खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२१/प्र.क्र.२९३ /शिक्षण-२**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ६ जून, २०२५.

वाचा:-
१. **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२०२०/ प्र.क्र.२८६/ शिक्षण-२, दिनांक १५ जून, २०२१.**
२. **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:-संकीर्ण-२०२० /प्र.क्र.१३७/ महामंडळ, दि. २३ जून, २०२१**
३. **शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्रमांक:- भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/ भाग-III/ उद्योग-४, दि. ०१ डिसेंबर,२०१६.**
४. **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:-बीसीएच-२०२१/ प्र.क्र.२९३/ शिक्षण-२, दि.३१ जानेवारी, २०२५.**
५. **व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. उकाकमपुणे / वसतिगृह फर्निचर व इतर साहित्य / निविदा-२३-२४/२५-२६/७६,दि.०४ एप्रिल, २०२५.**

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत स्थलांतरीत ऊसतोड कामगारांच्या मुला-मुलींसाठी दिनांक १५ जून,२०२१ च्या शासन निर्णयान्वये संत भगवानबाबा शासकीय वसतिगृह योजना सुरू करण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत पहिल्या टप्प्यात राज्यातील बीड, जालना, अहमदनगर या तीन जिल्हयातील १० तालुक्यामध्ये मुलांसाठी १० व मुलींसाठी १० (प्रत्येकी १०० क्षमतेची) अशी एकूण २० वसतीगृहे सुरू करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संत भगवानबाबा शासकीय वसतिगृहातील प्रवेशित मुलामुलींना आवश्यक सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये आवश्यक वस्तु/साहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे यांनी ई-निविदा प्रक्रिया राबवून संदर्भाधीन क्र. ५ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार ई-निविदा प्रक्रियेतील एल-१ निविदाधाकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील संत भगवानबाबा शासकीय वसतीगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांना सोयी-सुविधा उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने एकूण रक्कम रू. ७,५१,३७,६००/- (अक्षरी रक्कम रूपये सात कोटी एकावन्न लाख सदतीस हजार सहाशे फक्त) इतक्या रक्कमेच्या साहित्य/ वस्तुंची खरेदी ई-निविदा प्रक्रियेतील एल-१ निविदाधारक मे. प्रिया कुलर ॲन्ड स्टिल इंन्डस्ट्रीज, भंडारा यांच्याकडून करण्यास मान्यता देण्यात येत आहे. मे. प्रिया कुलर ॲन्ड स्टिल इंन्डस्ट्रीज, भंडारा यांच्याकडून खरेदी करावयाच्या वस्तुंचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| **अ. क्र.** | **वस्तूंचे नाव** | **आकारमान** | **मागणी** | **वस्तु / साहित्याचा दर (जीएसटीसह)** | **एकुण रक्कम** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **४** | **३** | **६** | **७** |
| १. | कार्यालयीन संगणक | AIO-Processor Make Intel Processor Generation ९ above, number of cores per Processor ६, Processor Description intel core i५, chipset Series intel B series, Operating system (Factory Pre-loaded) Windows १० Home, RAM Size (GB) ४ GB, Type of Drives used to populate the Internal Bays HDD, Total HDD Capacity (GB) १०००, Display Size (INCHES) २१.५, Display Resolution (PIXELS) १९२० X १०८० Availability of Webcam integrated with Display yes, on site OEM warranty (year) ३. | २० | ७०,५०० | १४,१०,००० |
| २. | विद्यार्थ्यांसाठी संगणक | | १४० | ७०,५०० | ९८,००,००० |
| ३. | प्रिंटर | Cartridge technology Composite Cartridge, Printing Technology Laser, Type of Printing Mono, Paper size A४, Duplexing Feature yes, Wireless connectivity yes, Number of Main Paper trays १, On site OEM Warranty (years) ३ | २० | १६,८०० | ३,३६,००० |
| ४. | कार्यालयीन खुर्ची | ३ x १.५ x १.५ in Ft | २० | ८,३५० | १,६७,००० |
| ५. | विद्यार्थी खुर्ची | | २००० | ८,३५० | १,६७,००,००० |
| ६. | कार्यालयीन टेबल (ड्रॉवरसह) | ४ x ३ x २.५ in Ft | २० | १४,२०० | २,८४,००० |
| ७. | विद्यार्थी अभ्यास टेबल | ६०० mm (W) x ६०० mm (D) x ७५० mm (H) | २००० | १३,१०० | २,६२,००,००० |
| ८. | वॉटर कुलर कम फिल्टर | Water Purifier with water cooler, Inbuilt Storage Tank, Maximum input Water १००० lit, Fully Automatic with auto cut off, Ultraviolet | ६० | ७९,५०० | ४७,७०,००० |
| ९. | इलेक्ट्रीक वॉटर हिटर | ५० Litre | ६० | १७,९०० | १०,७४,००० |
| १०. | डायनिंग टेबल | ६ x २.५ x २.५ in Ft | १४० | १५,३०० | २१,४२,००० |
| ११. | अग्निशमन यंत्र | Fire Extinguisher, ४ Kg | ३४० | ६,१९० | २१,०४,६०० |
| १२. | ग्रंथालय कपाट | ६" x ३" x १" | १०० | १५,५०० | १५,५०,००० |
| १३. | डायनिंग टेबल | ६ x १ x १.५ in Ft | १००० | ८,६०० | ८६,००,००० |
| | | **एकूण** | | | **७,५१,३७,६००** |

**(अक्षरी रक्कम रूपये सात कोटी एकावन्न लाख सदतीस हजार सहाशे फक्त)**

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त संत भगवानबाबा शासकीय वसतिगृह योजनेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना आवश्यक सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी उक्त तक्त्यात नमूद आवश्यक साहित्य /वस्तुंचा खरेदी करण्याच्या अनुषंगाने खालील अटी व शर्तीचे पालन करणे बंधनकारक असेल :-

१. ई-निविदेतील अटी व शर्ती तसेच निविदेमध्ये असलेल्या specification नुसार संत भगवानबाबा शासकीय वसतिगृहांमध्ये आवश्यक साहित्य/ वस्तुंचा पुरवठा करणे बंधनकारक राहील.

२. व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ, पुणे यांनी सदर आदेश प्राप्त झाल्यानंतर पुरवठादारास तात्काळ पुरवठा आदेश द्यावेत.

३. पुरवठा आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून निविदेमध्ये नमूद कालमर्यादेत आवश्यक साहित्य/ वस्तुंचा पुरवठा स्वखर्चाने करावा लागेल. पुरवठादाराने विहीत वेळेत पुरवठा न केल्यास, निविदेमधील अटी व शर्तीनुसार पुरवठादारावर दंडात्मक कारवाई करण्यात येईल.

४. पुरवठादार संस्थेने पुरवठा आदेश प्राप्त झाल्यानंतर ८ दिवसांच्या आत व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे यांच्यासोबत रु.५००/- च्या स्टँम्प पेपरवर करारनामा करणे बंधनकारक राहील.

५. पुरवठादार संस्थांनी पुरवठा करावयाच्या वस्तुंच्या आवश्यकतेनुसार व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे यांच्याकडे नमुने सादर करावेत. शासकीय वसतिगृहांमध्ये आवश्यक साहित्य/ वस्तु या विहीत मानकाप्रमाणे आहे किंवा नाही, याबाबत त्यांनी उद्योग,उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय, दिनांक १.१२.२०१६ अन्वये विहित केलेल्या तरतुदीनुसार मान्यता प्राप्त संस्थेकडून सदर वस्तुंची तपासणी करावी व नमुना तपासणी करण्याकरिता येणारा खर्च संबंधित निविदाधारकांकडून घेण्यात यावा.

६. संत भगवानबाबा शासकीय वसतिगृहांमध्ये आवश्यक साहित्य/ वस्तुंचे दर हे सर्व करासहित व खर्चासहित असल्याने मंजूर किंमती व्यतिरिक्त कोणतीही रक्कम अदा केली जाणार नाही. त्यामुळे जीएसटीसह शासनाने निर्धारीत केलेले सर्वकर भरण्याची जबाबदारी पुरवठादाराची राहील. साहित्य/ वस्तुंचे पुरवठ्याचे देयके (Invoice) सादर करतांना वस्तुंची किंमत तसेच जीएसटी व अनुज्ञेय असल्यास सर्व करांची रक्कम स्वतंत्ररित्या नमूद करणे आवश्यक राहील. तसेच प्रति वस्तु/साहित्याच्या दरात तांत्रिक मनुष्यबळ पुरविण्यासाठी (installation/repair) लागणारा खर्च, वाहतूक खर्च इत्यादी सर्व बाबी समाविष्ट आहेत.

७. पुरवठादार यांनी उपरोक्त नमूद साहित्य संबंधित वसतिगृहांना पोच केल्यानंतर वस्तु/साहित्य मिळाल्याची पोच पावती (delivery challan) संबंधित वसतिगृहाच्या गृहपालाच्या दिनांकित स्वाक्षरी व शिक्क्यासह घ्यावी. त्यानंतर पोच पावती प्राप्त झालेल्या वस्तु/साहित्याच्या संख्येनुसार देयक (Invoice), पोच पावती (delivery challan) सहीत संबंधित पुरवठादार यांनी व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे यांच्याकडे सादर करावे.

८. याकरिता येणारा खर्च हा व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ, पुणे यांच्याकडे उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

९. संत भगवानबाबा शासकीय वसतिगृहांना पुरविण्यात येणाऱ्या वस्तु/साहित्याबाबत काही तांत्रिक बाबी किंवा अन्य समस्या/तक्रार उद्भवल्यास शासन कोणत्याही पातळीवर सदर पुरवठा आदेश रद्द करण्याचे अधिकार राखून ठेवत आहे.

३. सदर आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग-पहिला,उपविभाग-तीन,अ.क्र.४, परि. क्र. २७ (२) (अ), भाग-पहिला, उपविभाग-२, अ.क्र.२७ अ, नियम क्र.७६, अ.क्र. ३७, नियम क्र.९०, अ.क्र.४५, नियम क्र.१६९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०६१४२७०८६४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2025.06.06 14:28:17 +05'30'

**(सो.ना.बागुल)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
४. प्रधान सचिव, सा. न्या. व वि. स. विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. व्यवस्थापकीय संचालक,लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे
६. सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण,
७. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९. मे. प्रिया कुलर ॲन्ड स्टिल इंन्डस्ट्रीज,भंडारा,
१०. निवड नस्ती (शिक्षण-२).